जिल्हा रूग्णालय ठाणे चे ९०० खाटांचे रूग्णालयाचे बांधकाम करणेकरीता प्रादेशिक मनोरूग्णालय, ठाणे येथील आवारातील आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र ठाणे येथे रूग्णालयाचे स्थलांतरीत करण्यात आलेल्या कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.(रूपये ४,२८,३७,९७०/-)

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२४/ प्र.क्र.९७/ आरोग्य-३अ**

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

दिनांक : ३० जुलै, २०२४.

**वाचा :-**

१) शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक. प्रशामा-२०२०/प्र.क्र.१६९/आरोग्य-३अ, दि.१०.१२.२०२०

२) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. आआसे/कक्ष-३/टे.६/जिरूठाणेस्थलांतरीतकामे/३०१४-१५/२४, दिनांक २९.०२.२०२४.

३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-२०२४/प्र.क्र.९७/आरोग्य-३अ, दि. ११.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ०१ येथील दिनांक ०४ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयान्वये, जिल्हा सामान्य रुग्णालय, ठाणे येथे ९०० खाटांचे जिल्हा रुग्णालय, संदर्भ सेवा रुग्णालय व परिचारिका प्रशिक्षण केंद्र आणि वसतीगृह इमारत बांधकामाचे रु. ५२७,४१,१५,०४८/- ( रुपये पाचशे सत्तावीस कोटी, एकेचाळिस लक्ष, पंधरा हजार, अठ्ठेचाळीस फक्त) इतक्या रक्कमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. आता सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक ०२ येथील दि. २९.०२.२०२४ च्या पत्रान्वये, जिल्हा रुग्णालय, ठाणे एकूण ९०० खाटांचे रुग्णालयाचे नवीन बांधकाम करण्याकरीता प्रादेशिक मनोरूग्णालय ठाणे येथील आवारातील आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र ठाणे येथे रूग्णालयाचे, स्थलांतरीत करण्यात आलेल्या विविध कामाचे अंदाजपत्रके शासनाच्या मान्यतेसाठी सादर केली आहेत. सदर अंदाजपत्रके कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक १, ठाणे यांनी तयार केलेले आहे. तसेच अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे, जिल्हा शल्य चिकित्सक, ठाणे यांनी साक्षांकित केले आहे. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांनी विविध कामांच्या अंदाजपत्रकास काम निहाय स्वतंत्र तांत्रीक मान्यता प्रदान केलेली आहे. सदर अंदाजपत्रक हे सन २०२२-२०२३

च्या दरसूचीवर आधारित आहे. सदरहू अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-२०२४/प्र.क्र.९७/आरोग्य-३अ, दि. ११.०३.२०२४ अधिक्रमित करण्यात येत आहे.

जिल्हा रुग्णालय, ठाणे येथील नवीन ९०० खाटांचे बांधकाम करण्याकरीता अस्तीत्वातील इमारतीमधील रूग्णकक्ष व विभाग हे प्रादेशिक मनोरूग्णालय, ठाणे आवारातील नव्याने बांधण्यात आलेल्या आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र ठाणे येथील आवारातील इमारतीमध्ये स्थलांतरीत विविध रूग्णकक्ष व विभागांकरीता केलेल्या कामाचे खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे रुपये ४,२८,३७,९७०/- (रूपये चार कोटी अठ्ठावीस लक्ष सदतीस हजार नऊशे सत्तर फक्त) इतक्या रकमेस सोबत जोडलेल्या RECAPITULATION SHEET नुसार खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित किंमत (रूपये) |
|---|---|---|
| १ | महिला व बाल रूग्णालय इमारतीसाठी पाण्याची टाकी व जलवाहिन्यांची कामे करणे | ४,२८,३७,९७० |

**अटी व शर्ती** :-

१) सदर कामाचे सविस्तर अंदाजपत्रक व आराखडयास संबंधित मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग यांची मान्यता घेण्यात यावी.

२) काम सुरु करण्यापुर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

३) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या-त्या क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.

४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि. ०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

७) नियोजित जागा ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

८) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

९) सदर काम मंजूर रक्कमेत पुर्ण होईल याची दक्षता घेण्यात यावी. तसेच सदर काम उपलब्ध निधी मधून करण्यात यावे.

१०) शासन निर्णय उद्योग उर्जा व कामगार विभाग दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ अन्वये "वस्तू व सेवा खरेदीसाठी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GEM) याची कार्यपध्दती व मार्गदर्शक सूचनांनुसार निविदेची कार्यवाही करण्यात यावी"

३. सदर बांधकामांवरील होणारा खर्च हा "मागणी क्रमांक-एच-८, मुख्यलेखाशीर्ष ४२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजानिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय), ११०-रूग्णालये व दवाखाने, (०१) (अ) पंचवार्षिक योजनातर्गत योजना-इमारती (००)(०१) मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३-मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ व दि. २०.०९.२०१९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ येथील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७३०१५४५५८०९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.07.31 10:34:18 +05'30'

**(अ.भि.मोरे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१.महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.

२.आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
६. जिल्हा शल्यचिकित्सक, ठाणे
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, ठाणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
९. कार्यकारी अभियंता, सा. बा. विभाग, ठाणे
१०. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रूग्णालय, मुरबाड, जि. ठाणे.
११. अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव (आरोग्य-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई
१३. कक्ष अधिकारी, इमारत१/२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती ( आरोग्य-आ. ३अ ).

परिशिष्ट 'अ' क्र.प्रशामा - २०२४/प्र.क्र.८७/आ-३५

नाव- जिल्हा सामान्य रुग्णालय, ठाणे येथे ९०० खाटांचे नवीन रुग्णालयाचे बांधकाम करणेकरिता अस्तित्वातील जिल्हा सामान्य रुग्णालय रूग्णकक्ष, विभाग व कार्यालये प्रादेशिक मनोरुग्णालय ठाणे यांच्या अखत्यारीतील जागेवर स्थलांतरित करणे. [टप्पा क्रं.२] महिला व बालकल्याण इमारतीची कामे करणे.

## RECAPITULATION SHEET

| अ.क्र. | | कामाचे नाव | | अंदाजीत किंमत |
|---|---|---|---|---|
| आ) | | स्थापत्य कामाची किंमत | | |
| | | उपअंदाजपत्रक क्र. | | |
| | १ | महिला व बालकल्याण इमारतीसाठी पाण्याची टाकी व जलवाहिन्यांची कामे करणे. | रु. | २१,०९,२५६ /- |
| | २ | महिला व बालकल्याण इमारतीसाठी पर्जन्यवाहक गटर्स बांधणे. | रु. | १४,७०,६६४ /- |
| | ३ | महिला व बालकल्याण इमारतीसाठी ॲल्युमिनियम पार्टिशनस बांधणे. | रु. | २०,८०,७४५ /- |
| | ४ | सामान्य रुग्णालयासाठी काउंटर प्लॅटफॉर्म, आभासी छत, कंटेनर उचलण्यासाठी हायड्राची तरतूद व रंगकाम करणे. | रु. | २०,६०,०१० /- |
| | ५ | महिला व बालकल्याण इमारतीच्या समोरील भागाचे व डाव्या बाजूचे कॉंक्रीट पेव्हर्सचे काम करणे. | रु. | २०,३९,५८० /- |
| | ६ | महिला व बालकल्याण इमारतीच्या बाहेरील भागाचे ॲल्युमिनियम पार्टिशनस बांधणे. | रु. | २०,५२,२३४ /- |
| | ७ | महिला व बालकल्याण इमारतीसाठी मागील भागाचे व उजव्या बाजूचे कॉंक्रीट पेव्हर्सचे काम करणे. | रु. | १९,५८,३९७ /- |
| | ८ | स्वयंपाकगृहासमोर स्टील फॅब्रिकेशनसह प्रीकोटेड पत्र्याचे शेड बांधणे. | रु. | २१,०९,७७० /- |
| | ९ | सामान्य रुग्णकक्ष इमारतीच्या समोरील भागाचे ४.०० मीटर उंचीचे स्टील फॅब्रिकेशनसह प्रीकोटेड पत्र्याचे शेड बांधणे. | रु. | २१,११,६८० /- |
| | १० | सामान्य रुग्ण कक्षासमोर स्टील फॅब्रिकेशनसह प्रीकोटेड पत्र्याचे शेड बांधणे. | रु. | २१,०७,२९७ /- |
| | ११ | जिल्हा सामान्य रुग्णालय ठाणे अंतर्गत इको-फ्रेंडली स्वच्छतागृहे पुरविणे, स्वच्छतागृहासाठी टॉयलेटसाठी कॉंक्रिटचा ओटा बांधणे. | रु. | २१,११,२४४ /- |
| | १२ | जिल्हा सामान्य रुग्णालय ठाणे अंतर्गत जनरेटरसाठी स्टील फॅब्रिकेशनसह प्रीकोटेड पत्र्याचे शेड बांधणे. | रु. | ११,९७,२९० /- |
| | १३ | जिल्हा सामान्य रुग्णालय ठाणे अंतर्गत जमिनीवरच्या पाण्याच्या टाक्यांसाठी प्लॅटफॉर्म , डायलिसिस वार्ड, लॉन्ड्री सेक्शन जनरल वार्ड ओपीडी येथे पाण्याच्या टाक्या बसविणे | रु. | २१,१२,०२९ /- |
| | १४ | जिल्हा सामान्य रुग्णालय ठाणे अंतर्गत प्रशिक्षण इमारतीमधील दंतरुग्ण कक्षासाठी केबिन पार्टीशन करणे. | रु. | २०,३९,५४५ /- |
| | १५ | जिल्हा सामान्य रुग्णालय ठाणे अंतर्गत ओपीडी सेक्शनसाठी फॉल्स सीलिंग, स्लाइडिंग विंडो, विनाईल फ्लोरिंग इ. कामे करणे. | रु. | २१,०३,६२१ /- |
| | १६ | ओपीडी सेक्शनसाठी कॉंक्रीट पेव्हमेंट तयार करणे व जलवाहिन्यांची कामे करणे. | रु. | २१,२०,३३९ /- |
| | १७ | जिल्हा सामान्य रुग्णालय ठाणे अंतर्गत ओपीडी सेक्शनसाठी पार्टिशन तयार करणे. | रु. | २१,०८,६९६ /- |
| | १८ | ओपीडी सेक्शनसाठी स्टीलचे फॅब्रिकेटेड प्रिकोटेड पत्राचे शेड तयार करणे. | रु. | २१,०५,८९७ /- |
| | | एकूण किंमत रु. | रु. | ३,५९,९८,२९४ /- |
| ब) | | कामगार विमा १.००% | रु. | ३,५९,९८३ /- |
| क) | | १८.००% वस्तू व सेवा कर | रु. | ६४,७९,६९३ /- |
| | | एकूण किंमत रु. | रु. | ४,२८,३७,९७० /- |